**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र झेडजी-०४, (४२२५१९२२) अंतर्गत भागभांडवली अंशदान निधी वितरीत करणेबाबत.....**
**पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी)**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक-२०२३/प्र.क्र.८८/महामंडळे**
मोती महल खोली क्र.२, २ रा मजला,
१९५ जे.टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**संदर्भ:**

१. शासन निर्णय क्रमांक महामं-२०२३/ प्र.क्र.२२/महामंडळे, दिनांक ०९ ऑगस्ट,२०२३
२. वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ यांचे पत्र क्र. वनाविजाभज २०२२-२३/अधि. भाग.भां./प्र.क्र.०३/वि.व.ले.,दिनांक ०६/०२/२०२४
३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि. ०५ फेब्रुवारी, २०२४
४. शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.८८/महामंडळे, दि. २८ फेब्रुवारी,२०२४,

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय क्र. महामं-२०२३/ प्र.क्र.२२/महामंडळे, दिनांक ०९ ऑगस्ट,२०२३ अन्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मुख्य कंपनी) अंतर्गत पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी) स्थापनेस शासन मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर उपकंपनीचे अधिकृत भागभांडवल रू.५०.०० कोटी इतके निर्धारित करण्यात आले असून, दरवर्षी सदर उपकंपनीस वडार समाजासाठी विविध कल्याणकारी योजना राबविण्याकरिता रू.५.०० कोटी इतके भागभांडवल मंजुर करण्यात आले आहे.

डिसेंबर, २०२३ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मुख्य कंपनी) अंतर्गत अनुक्रमे पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी) साठी पुरवणी मागणीव्दारे रू.५.०० कोटी फक्त (अक्षरी रूपये पाच कोटी फक्त) इतके भागभांडवली अंशदान मंजुर करण्यात आलेले आहे.

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी) करिता पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या वित्तीय तरतूदीपैकी संदर्भीय शासन निर्णय क्र. ४ अन्वये रु. २.५० कोटी (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) इतके भागभांडवली अंशदान वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाला सद्यस्थितीत वितरीत करण्यात आले आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय शासन परिपत्रकानुसार भागभांडवली अंशदान वितरणाची मर्यादा ८० टक्के इतकी निर्धारीत करण्यात आली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागामार्फत बिम्स प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेले उर्वरीत रु.१.५० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतके भागभांडवली अंशदान पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीच्या भागभांडवलापोटी वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांतर्गत वडार समाजासाठी स्थापन करण्यात आलेल्या पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी) करिता डिसेंबर, २०२३ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.५.०० कोटी (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतके

भागभांडवली अंशदान पुरवणी मागणीव्दारे मंजुर करण्यात आले आहे. त्यापैकी संदर्भीय शासन निर्णय क्रमांक ०४ अन्वये रुपये २.५० कोटी (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) इतके भाग भांडवली अंशदान सदर उपकंपनीस वितरित करण्यात आले आहे .

सद्यस्थितीत वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकाच्या अनुषंगाने वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळास पैलवान कै.मारूती चव्हाण - वडार आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीच्या भाग भांडवलापोटी भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२२५ १९२२), ५४ गुंतवणुका अंतर्गत सन २०२३-२४ या वितीय वर्षाकरिता बीम्स प्रणालीवर उपलब्ध उर्वरित तरतूद रु. १.५० कोटी ( अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतके भागभांडवली अंशदान खालील अटींच्या अधीन राहून वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलातआणावेत. तसेच ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.

२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.

३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.

४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.

५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी ठोस प्रयत्न करावेत

६. सदर योजनेचा निधी Certificate Of Incorporation व Buisness Commencement Certificate तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.

७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.

८. प्राप्त भागभांडवल खर्च करतांना व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ यांनी वित्त विभागाच्या दि. २० मार्च, २०२४ च्या परिपत्रकातील सुचनेनुसार सदर प्रकरणी आदर्श आचारसंहिता २०२४ चे पालन होत आहे याची दक्षता घ्यावी.

**०२.** वरील अनुदानाबाबत उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहूजन कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी, म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत

**०३.** याबाबीवर खर्च मागणी क. झेडजी-०४, ४२२५, अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण यावरील भांडवली खर्च, ०३, मागासवर्गाचे कल्याण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर क्षेत्रातील गुंतवणूका, (०१) भागभांडवली अंशदान, (०१) (०२) वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२२५१९२२) ५४, गुंतवणुका या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२३/२०२४, दि. २१.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४०३/२०२४/व्यय-१४, दि. ३०.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४०२१५१२५२९४३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2024.04.02 15:22:16 +05'30'

**(नि.लो.वारुळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४/अर्थसंकल्प-३) मंत्रालय, मुंबई.
७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (रोखशाखा/अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (महामंडळे).